




**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक:-गौखनि-३६/०१२३/प्र.क्र.०३/ख-१** **दिनांक :-१६ एप्रिल,२०२४.**

विषय : **गौण खनिज-कोल्हापूर**
**सन २०१४-१५ या वर्षाकरिता मौजे महागाव, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर येथील वाळू गट नं. ४४, ४५ या वाळूगटाचा ताबा न मिळाल्यामुळे लिलावाची रक्कम परत मिळणेबत.**
**श्री.संतोष वसंत पाटील**

**शासन ज्ञापन:**

सन २०१४-१५ करीता मौजे महागाव, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर गट नं. ४४, ४५ हा वाळू गट ५३० ब्रास वाळू उत्खननाकरीता लिलावाधारक श्री. संतोष वसंत पाटील यांना रक्कम रुपये १८,५६,५२०/- इतक्या सर्वोच्च बोलीने अपर जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दि.२१/०२/२०१५ च्या आदेशान्वये मंजूर केला होता.

०२. तथापि, स्थानिक ग्रामस्थानी केलेल्या विरोधामुळे लिलावधारक यांना उक्त वाळू गटाचा ताबा देता न आल्याने लिलावधारक यांना सदर वाळू गटामधून वाळू उपसा करता आलेला नाही. सबब, अपर जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचा अहवाल, जिल्हास्तरीय सनियंत्रण समितीने दिनांक २७.०४.२०२३ च्या बैठकीमध्ये घेतलेला निर्णय व शासन निर्णय दि.१२/३/२०१३ मधील परिच्छेद C-१५ मधील तरतूद विचारात घेता, लिलावधारक यांनी लिलावापोटी शासन जमा केलेली संपूर्ण रक्कम रुपये १८,५६,५२०/- त्यांना परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. सबब, लिलावधारक श्री. संतोष वसंत पाटील यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर रक्कम रु.१८,५६,५२०/- (अठरा लाख छप्पन्न हजार पाचशे वीस फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. ०४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०४१८११५२२०४६१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.04.18 12:04:46 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, कोल्हापूर**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती